# आर्द्रा

[ नवकवितांचा संग्रह ]

प्रा. यशवन्त दत्तात्रय भावे



१९४९

मुद्रकः— ए. पी. चौगुले,
वीरभारत प्रेस, बेळगांव.

प्रकाशकः— अजित एजन्सी,
टिळकचौक बेळगांव.

मूल्य दोन रुपये



ज्यांनी माझी पहिली कविता वाचली,

पुरोगामी विचारसरणीनें, मार्गदर्शन करण्याचे

सततचे व्रत ज्यांनीं घेतलें आहे

आणि

अंतिम जीवनमूल्यावरची ज्यांची श्रद्धा

ज्वलंत आणि अढळ आहे

त्या

गुरुवर्य पु. ह. ऊर्फ रावसाहेब पटवर्धन

यांना

माझी ‘ आर्द्रा ’ नम्रभावानें अर्पिली आहे.



# माझें पान–

हा लहानसा काव्यसंग्रह मराठी वाचकांच्या पुढें ठेवतानां माझें मन आनंदानें भरून येत आहे.

या संग्रहातील कांहीं कविता प्रथमतः **सत्यकथेंतूनच** प्रसिद्ध झाल्या. त्या पुनर्मुद्रित करण्याची परवानगी दिल्याबद्दल सत्यकथेच्या भागवत बंधूंचा मी आभारी आहे.

या कवितांपैकीं, कांहीं थोड्या पादाकूलक तर कांहीं देवीवर छंदांतील आहेत. पण बऱ्याचशा मुक्तछंदांतच आहेत.

या कवितांतून एकाद्या ओळींत शब्दांत वा शब्दरचनेंत अधूनमधून नव्याजुन्या आंग्ल आणि मराठी कवींचे पडसाद उमटल्याचा वाचकांना भास झाला तर त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नाहीं. आपलें वाचन जर सृजनशील असेल तर वाचलेलें सर्व आपल्या मनाचा–अंतर्मनाचा एक भाग बनतें. आणि ज्यावेळीं आपल्या हातून कांही निर्मिती होऊं लागते त्यावेळीं आपण वाचलेल्यापैकीं एकादा शब्द, एकादी ओळ विजेच्या कणासारखी अभावितपणें लेखणीवाटे, वर्ण्यविषयाचा एक जिवंत भाग बनूनच चमकून जाते- असे सर्वांच्या बाबतींत व्हावयाचेच ! पण ऋण हें ऋणच. जुन्या नव्या आंग्ल व मराठी कवींना नम्रभावानें अभिवादन करून हें ऋण मी नमूद करतों.

मानवी मन हें अथांग सागरासारखें आहे. तेथें जें जें पडतें तें तें तळाशीं जातें. वाङ्मयीन अनुभव व जीवनाचा सर्व प्रकारचा अनुभव मानससागराच्या तळाशीं जाऊन पडतो आणि तेथें म्हणजे अंतर्मनांत या सर्व अनुभवांचे विचित्र मिश्रण तयार होतें. आपलें बहिर्मन या सांठ्याची आठवण पण ठेवीत नाहीं. पण कधींतरी,

केव्हांतरी, समाजजीवनाच्या, 'बाह्यजीवना' च्या सृष्टीच्या प्रकोपानें वा वाङ्मयीन अणुबाम्बनें हा मानससागर संपूर्ण ढवळला जातो; आणि मग एक प्रकारची रासायनिक प्रक्रिया होऊन अंतर्मन जागें होतें. अंत:चक्षूपुढून चलच्चित्रपट सरकत जातात. ते पाहात असतां कधीं उबग येते तर कधींकधीं आनंदाच्या रेशमी कळ्या मानसतरंगावर फुलतात; आणि वैचारिक भावनेचा उद्रेग होतो. ही अनुभूती बोलकी करावी असें वाटूं लागलें ह्मणजे शब्दाशब्दांतलें अंतर्संगीत साथ देऊं लागतें, प्रतिमा प्रतीकात्मरूप पावतात आणि विसंवादित्वांतून एकतानता जन्मते. असें कांहींथोडेसें माझ्या '**आर्द्रा**' च्या बाबतींत झालें आहे.

माझें स्नेही **डॉ. ग्रामोपाध्ये** यांनीं आपली व्यासंगपूर्ण प्रस्तावना लिहून मला फार उपकृत केलें आहे. कविताप्रेमी श्री. **बा. रं. सुंठणकर** व **डॉ. साठे** यांनीं दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल; अनेक ज्येष्ट व समवयस्क कविमित्रांनी ज्या सूचना दिल्या त्याबद्दल; आणि आवरणावरील प्रतीकात्मक सुंदर चित्र काढून दिल्याबद्दल कलानिकेतनचे कलावंत श्री **पवार**—यांचे आभार मानल्यावांचून रहावत नाहीं.

आणि शेवटीं वीरभारतप्रेसचे मालक श्री. **चौगुले** यांनी 'अजित एजन्सीतर्फे' ह्या काव्यसंग्रहाला 'उजेडात' आणल्याबद्दल मीं त्याचा फार ऋणी आहे.

मराठी कवितेचे रसिक माझ्या काव्याचे योग्य तें मूल्यमापन करतील अशी आशा व्यक्त करून पूर्णविराम देतों.

३१६ ठळकवाडी
पो. ठळकवाडी
बेळगाव

**—य. द. भावे**

६-५-४९

# नवकाव्य आणि 'आर्द्रा'

माझे मित्र प्रा. भावे यांचा 'आर्द्रा' हा नवकवितांचा संग्रह प्रसिद्ध होत आहे. प्रा. भावे हे कवि ह्मणून मराठी वाचकांना अगदीं अलीकडे माहिती झाले आहेत. गेल्या पांच-सहा महिन्यांत 'सत्यकथा' 'नवभारत' 'रोहिणी' इत्यादि मासिकांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यानंतर एकदम या संग्रहरूपानेंच ते वाचकांची भेट घेत आहेत. इतक्या लवकर संग्रह प्रसिद्ध करणारे ते पहिलेच कवि असावेत.

आज अनेक नवेजुने कवि कविता लिहीत आहेत. एके काळीं काव्याला ओहोटी लागल्याचा जो भास होत होता, त्याऐवजीं आतां काव्याला भर येऊं पहात आहे. मातबर मानले गेलेल्या कवींचे संग्रहहि प्रसिद्ध होत आहेत. काव्यगुणांच्या दृष्टीनें त्यांतील कांहीं कवितांचें मोलहि पुष्कळ आहे. तरीपण त्यांतील पारंपरिकतेमुळें मनाचें—काव्यास्वादाच्या दृष्टीनेंहि—समाधान होत नाहीं खरें. ज्या आशा आकांक्षा, ज्या जाणिवा नेणिवा, जे अनुभव समाजमनांत स्पंदन पावत आहेत त्यांचे भावचित्र त्यांतून पाहायला मिळत नाहीं. काव्यकला ही जीवनकलेचीच एक उत्कटावस्था. या उत्कटावस्थेचा भावप्रत्यय काव्यांतून व्यक्त झाला नाहीं तर दुसऱ्या कोणत्या कलेंतून व्यक्त होणार ? स्थितिगतीच्या संघर्षांतून जीवनौघ बदलत चालला आहे. कृतीची त्यांत भर पडत आहे. वस्तुतः कृतीनें स्थितिगतीला योग्य वळण मिळालें पाहिजे परंतु ती कृति जशी मानवी मनाच्या प्रेरणेतून जन्माला येते, तशीच स्थितिगतीनें निर्मिलेल्या परिस्थितींतूनहि स्फुरण पावते. स्थिति, गति आणि कृति यांच्यांतला असा हा परस्पर सापेक्षतावाद आहे. सामान्यतः या तीहींची समधानता टिकत नाहीं असें दिसतें. पण ती टिकली पाहिजे, वा टिकविली पाहिजे. मात्र जीवनावरची प्रगाढ निष्ठा असेल तरच ती टिकेल. जीवन ह्मणजे केवळ एका व्यक्तीचें वा समाजाचें जीवन नव्हे: आणि जीवननिष्ठा ह्मणजे कांहीं भोळीभाबडी श्रद्धा नव्हे: तर जीवनांतील शाश्वत अशा अंतिम मूल्यावरची श्रद्धा. स्थितिगतिकृति

ांतील समधातता बिघडली कीं जीवनांतील अंतिममूल्येंहि दृष्टिआड होतात. तेव्हां अंतिम मूल्यावरची दृष्टि अढळ ठेऊन त्यांचें दर्शन, स्थितिगतींत सांपड-लेल्या सर्वांना देत देत जीवनाला योग्य वळण लावायला जर कोणाची आवश्यकता असेल तर ती प्रतिभावंतांची, ह्मणजेच प्रतिभावंत कवींची. कवि, काव्य आणि जीवन ही पुनः त्रिपुटी आली. हीहि परस्पर सापेक्षच. अशाश्वत आणि व्यवहारी जीवनमूल्यांच्या तुलनेंत—ह्मणजे स्थलकालनिबद्ध अशा जीवनमूल्यांच्या तुलनेंत—काव्याचीं वाङ्मयीन मूल्यें कितींहि स्वतंत्र असलीं—आणि ती असलींच पाहिजेत—तरी अंतिम जीवनमूल्यांच्या तुलनेंत त्यांचा परस्पर संयोगच झाला पाहिजे. खरा कवि तोच, कीं ज्याच्या काव्यांतून जीवनाच्य अंतिम मूल्यांचा स्पर्श होईल.

आज शतकानुशतकें कवि हेंच करीत आले आहेत. तर मग नवकवि आणि नवकाव्य हे नवीन असें काय साधीत आहेत असा प्रश्न साहजीकच उपस्थित होतो. इतर कवि ज्या कांहीं प्रकारांनीं कविता लिहीत आहेत त्यापेक्षां थोड्या निराळ्या प्रकारानें लिहणारे कवि एवढेंच त्यांचें महत्व कीं यापेक्षां कांहीं अधिक महत्व या नवकाव्याला द्यायला पाहिजे ? आणि द्यायचें झालें तर कां ?

मराठी काव्याची परंपरा फार थोर आणि अभिमानास्पद आहे. परंतु केशवसुतांना जेव्हां 'नव्या मनू'चा नवा प्रत्यय आला, तेव्हां 'जुनें जाउं द्या मरणालागुन' ह्मणत त्यांनीं तुतारी फुंकली आणि बंडाचा झेंडा फडकावला. अर्वाचीन काव्याची ती प्रभात होती. परंतु प्रभातींलाच सूर्यानें आपले प्रखर किरण चहूंकडे फेंकले आणि 'अवडंबरलीं ढगें' पळविलीं. नव्या मनूच्या नव्या शिपायाचें नवकाव्यच तें. या नवकाव्यानें काव्यावर चढलेलें रूढ सांकेतिक कल्पनांचें कवच फोडून खऱ्या काव्याचें दर्शन दिलें. पण पुनः त्यांतूनहि परंपरा सुरू झाली. जवळ जवळ अर्ध शतक होत आलें. मध्यंतरीं दोन महायुद्धें झालीं; कवींच्याहि दोन पिढ्या होऊन गेल्या. परंतु काव्यांत मात्र तीच केशवसुतांची परंपरा चालू आहे. थोड्या वळणांचा आणि चालीरीतींचा फरक असेल. पण मूळ मूस तीच. मग ती कविता क्रांतिवादी असो, अभि-संप्रदायी असो. यज्ञसंप्रदायी असो. कीं मानवतावादी असो तेजाची पूजा

करीत वाटचाल करायची. प्रयत्न प्रामाणिक असेल. प्रतीतिहि खरी असेल. परंतु ही संपूर्ण प्रतीति वाटत नाहीं. यांतहि कांहीं संकेतांचा आश्रय आढळतो. अनुभूतीची कक्षाहि मर्यादित वाटते. ध्येयवादित्व, समाजसुधारणेची तळमळ, व्यक्तिस्वातंत्र्याची कळकळ, प्रेमाची पूजा, सौंदर्याची भक्ति, या साऱ्यांचे ध्वनिहि मधून मधून ऐकूं येतात. परंतु तेहि केशवसुती परंपरेचे केशवसुतांची परंपरा असली म्हणून गौणत्व येण्याचें कारण नाहीं. परंतु त्यांत निदान केशवसुतांचा आवेश, आशयप्राधान्य, दृष्टीचें विशालत्व, जीवनाचें ममत्व आणि तेजस्वी क्रांतिकारकत्व यांचा प्रत्यय तरी आला पाहिजे. मग फार तर, काळ बदलला, जीवनमूल्यें बदललीं, तरी कवि मागेंच आहेत एवढेंच फार तर म्हणतां आलें असतें. परंतु केशवसुतांच्या गुणांचा वारसा जरी घेतला असला, तरी तो संपूर्णपणें एकाद्या कवीनें घेतलेला दिसत नाहीं. सारांश, जरा निराळ्या वळणानें परंतु तोच केशवसुतांचा romanticism अजूनहि काव्यांत दिसून येतो.

परंतु गेल्या कांहीं वर्षांत ही स्थिति बदलण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. कांहीं कवींना ही जाणीव झाली आहे. संकेतांचा त्यांनाहि वीट आलेला दिसत आहे. जीवनविषयक विशिष्ट दृष्टीहि प्राप्त होत आहे. आणि पुनः एकदां काव्याचें पुनरुज्जीवन होत आहे. काव्याच्या इतिहासांत असें कार्य वरचेवर करावें लागतें; आणि तेंहि केवळ काव्याचें खरेंखुरें स्वरूप व्यक्त करण्यासाठींच. सांस्कृतिक जीवनावस्थेची जी बाह्य कळा असते, ती बाह्य कळा म्हणजेच काव्याचा प्राण अशी कल्पना रूढ झाली कीं तात्कालीन काव्यावरहि तशीच कळा चढूं लागते; आणि खरा जीवनानुभव त्यांतून मिळूं शकत नाहीं. हा जीवनानुभव मिळविण्यासाठींच—आणि वाचकांनाहि देण्यासाठीं—खऱ्या कवींची धडपड असते. या दृष्टीनें आजची जीवनावस्था आणि काव्य यांचा विचार झाला पाहिजे. म्हणजेच आजच्या नवकाव्यांत जी कांही विशिष्ट प्रवृत्ति दिसून येते तिची संगति आणि अर्थ लागूं शकेल.

स्थूल मानानें विचार केला तरी आजचें युग हें यांत्रिक युग आहे. यंत्राचा ताबा कांहीं एका विशिष्ट वर्गाकडे आहे. हा विशिष्ट वर्ग शासनसंस्थेवरहि अंमल चालवितो, असेंहि दिसून येतें. साहजिकच मूठभर धनिकांच्या ताब्यांतील यंत्रांनीं शासनसंस्थेच्या संरक्षणाखालीं, किंबहुना वेळप्रसंगीं शासनसंस्थेवरहि

शास्तेपण गाजवून आपलें अधिराज्य चालविलें आहे. याचा एकंदर परिणाम काय होतो याचा विस्तारानें येथें विचार करण्याचें कारण नाहीं. पण सर्व-सामान्य मानवाच्या नैसर्गिक जीवनप्रेरणांची त्यानें अतोनात कुचंबणा होते एवढें ह्मटलें ह्मणजे पुरें. यंत्राचा आणखी एक गुण आहे. जीव घेणारा अवगुणच तो! मानवांच्या गळीं पडत, त्याचीच सुखसमाराधना करीत असल्याचें भासवीत, अखेर त्याच्या नैसर्गिकतेला मारून त्यांचींहि यंत्रें बनविणारा तो गुण वा अवगुण आहे; आणि त्याचा मोह तरी किती जबरदस्त! ऐहिक जीवनाची त्यानें केलेली प्रगती इतकी विस्तारली आहे कीं त्यांतून बाहेर पडणें मुष्किलीचें झालें आहे. ह्मणून यंत्रांच्या छायेंत सुखशांति शोधण्याची धडपड चालू झाली आहे. त्यांत मानवाच्या विज्ञानाची भर पडत आहे. जणु विज्ञानाचें आणि यंत्राचें लग्नच लागलें आहे. आणि ह्मणूनच एकमेकांच्या सहाय्यानें पृथ्वीवर नंदनवन स्थापन करूं असा त्यांना भरवंसा वाटत असावा. विज्ञान मनांतून ह्मणते कीं मी आपल्या बुद्धिबलानें यंत्राला आपल्या सहज कह्यांत ठेवीन. पण यंत्रांची वाणच इतक्या झपाट्यानें होत आहे कीं त्यांना आवरण्यांत विज्ञानाची दमछाक होत आहे. या ओढाताणींत सर्वसामान्य जनता मात्र हैराण झाली आहे. विज्ञानानें नवीन नवीन शास्त्रें निर्माण केलीं. शास्त्रांनीं काय केलें तर रोगनिदान केलें. पण अमोघ औषधाच्या अभावीं रोगांची फक्त जाणीव झाली, आणि मनाची अस्वस्थता मात्र वाढली; त्या जोडीला समाजांतील व्यक्ती-व्यक्तीच्या, वर्गावर्गाच्या, आणि राष्ट्राराष्ट्रांच्या हितसंबंधांची भुतावळ होती ती निराळीच. या सर्वांचा परिणाम युद्धांत होणें अपरिहार्य आहे. हें युद्धहि अनेक प्रकारचें आहे. युद्ध ह्मटलें कीं संहार हा आलाच. या रीतीनें संहाराची अवस्था निर्माण झाली. मधून मधून युद्ध थांबल्यासारखें वाटतें, शांततेच्या नि पुनर्रचनेच्या घोषणा नि प्रयत्न केल्यासारखे वाटतात; परंतु हें सारें वरचें लिंपण ठरतें. रोगाचेंच निर्मूलन करण्याच्या योजना व्हायला पाहिजेत. परंतु या योजनाबाबतहि भिन्न प्रवृत्ति आढळतात. एक या योजनावर विश्वास ठेऊन राहणारी भोळीभाबडी वृत्ति. या वृत्तीच्या व्यक्तींना फारशी झळ लागलेली नसते, त्यामुळें आंतरिक वेदनांची कळहि उठलेली नसते. साहाजिकच 'एवढें

काय त्याचें?— होईल सारें ठाकठीक!' अशा प्रकारची भाषा त्यांच्या तोंडून येते. हा थोडाफार आत्मसंतुष्ट (self-complacent) असलेल्याचा वर्ग आहे. एका दृष्टीनें मूळ रोगाइतकीच ही बेफिकिरीहि घातुक असते. म्हणूनच दुसऱ्या प्रवृत्तीच्या लोकांना अधिकच चीड येते, घृणा उत्पन्न होते. याखेरीज डोळे उघडे ठेऊन कठोर वास्तवावर नजर भिडविणारी, ताकद नसल्यानें दूर पळणारी, कांहीच इलाज न दिसल्यानें अगतिक झालेली, अशा अनेक प्रवृत्ति समाजांत आढळतात.

समाजाच्या एकंदर परिस्थितीचा परिणाम संस्कारक्षम आणि प्रगतिशील मनावर होणें अपरिहार्य आहे. आणि अशा तऱ्हेचा परिणाम आज कांही नवकवींच्या मनावर होत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. सामाजिक परिस्थिति आणि कविमनाची वैयक्तिक प्रेरणा यांचा हा एकप्रकारचा संघर्ष आहे. या संघर्षांतूनच कवींची प्रतिक्रिया भावनात्मकतेनें व्यक्त होत आहे. परंतु या भावनात्मकतेमागें एक वैचारिक बैठकहि आहे. भावनात्मकता आणि वैचारिकता यांच्या कांहीं एका रासायनिक प्रक्रियेंतून त्यांची आंतरिक वेदना व्यक्त होत आहे. या वेदनेचें अभिव्यक्त स्वरूप मात्र त्या त्या कवीच्या प्रकृतीनुरूप भिन्न भिन्न पद्धतीनें आविष्कृत होत आहे. यादृष्टीनें आज जें थोडें फार नवकाव्य लिहलें जात आहे त्याकडे पहाणें मोठें उद्बोधक आहे. कुणाच्या प्रतिक्रियेंतून समाजाचा रोग दुराराध्य झाल्यानें आतां सरळ त्याची तिरडी बांधायला पाहिजे असा उद्वेगाचा सूर ऐकूं येतो, तर कुणाच्या जाणिवेंतून मानवी मनाच्या खोल नि अज्ञात अशा नेणिवेचीं तरळून जाणारीं सूक्ष्म चित्रें दिसत आहेत; तर कुणाची घृणा मस्तकाला भिडत आहे. वास्तवाचें इतकें विदारक चित्र आजवर काव्यांतून या प्रकारें व्यक्त झालें असेल असें वाटत नाहीं. नवकाव्याचे हे जे प्रयत्न नि प्रयोग चालू आहेत त्यांत प्रस्तुत 'आर्द्रा' या काव्यसंग्रहानें भर पडत आहे. प्रा. भावे यांची ही नवकविता सामाजिक नि वैचारिक खळबळींतून व्यक्त झाली आहे. सामाजिक परिस्थितीची कविमनावर जी कांहीं प्रतिक्रिया झाली आहे तिचें एक अभिनव आणि मनोरम स्वरूप प्रस्तुत काव्यांतून पहायला मिळतें. ही एकप्रकारची वैयक्तिक प्रतिक्रिया असली तरी

ती व्यक्तिजीवनावर आधारली नाहीं. भावे यांच्या प्रतिभेनें व्यक्तिजीवनाचं कुंपण ओलांडले आहे. प्रस्तुत संग्रहांत व्यक्तिजीवनावर आधारलेल्या पांच-सहा कविता असल्या तरी इतरांची बैठक सामाजिक आहे

सामाजिक परिस्थिति आणि आंतरिक प्रेरणा यांच्या संघर्षांतून ज्या ठिणग्या उडाल्या आणि त्यांनीं जी कांहीं नवसृष्टि उजळली ती काव्यांतून व्यक्त करण्याचा भावे यांचा हा प्रयत्न आहे. उजळलेली सृष्टि जितकी अभिनव, त्यामुळें निर्माण झालेली भावमूर्ति जितकी निराकार, तितकी कवीच्या अभिव्यक्तीलाहि ती कठीण. पुनः तींतून जी संगति लागली ती व्यक्त करायला जुने संकेत निरुपयोगी. आणि व्यक्त करायचा आशय तर इतका अमूर्त (abstract) कीं तो एकादुसऱ्या प्रतिमांनीं व्यक्त होणें अशक्य. या सर्व गोष्टींचा परिणाम कांहीं एका प्रतीकयोजनेंत होणें अपरिहार्य आहे. भावे यांच्या कवितांचें बाह्यस्वरूप प्रतीकात्मक आहे तें यामुळेंच.

प्रतीकरूप कविता आजवर महाराष्ट्रांत लिहिली गेली नाहीं असें नाहीं. अध्यात्मिक काव्यांतून त्यांचा उपयोग पुष्कळच केला गेला आहे. अर्वाचीन गूढगुंजनात्मक काव्यांतहि तो येणें साहजिक होतें. आधिभौतिक जीवनावर आधारलेल्या कांहीं कवितेंतूनहि त्याचा उपयोग कांही कवींनीं मधून मधून केला आहे. विशेषतः वा. ना. देशपांडे यांच्या काव्यांत तो विशेष आढळतो. परंतु तेथें केवळ परोक्ष पद्धति म्हणून प्रतिकांचा उपयोग केला आहे असें दिसतें. प्रस्तुत संग्रहांतील भावे यांच्या कवितेंत येणारी प्रतीकयोजना निराळ्या प्रकारची आहे. किंबहुना त्यांची सारी कविता प्रतीकवादी आहे असें म्हणायला हरकत नाहीं.

शब्द कितीहि समर्थ असला, भाषा कितीहि अर्थप्रसू असली तरी तिलाहि कांहीं मर्यादा असते. स्थळकालाच्या बंधनांनीं ती बांधलेली असते. संकेतांनीं ती पुष्ट झालेली असते. परंतु अशा भाषेलाहि आजवर अनेकदां हात टेकावें लागलें आहेत. परमेश्वराचें वर्णन तर ती नेति नेति म्हणूनच करते. प्राचीन संतकवींचा आध्यात्मिक अनुभव तिला सरळपणानें व्यक्त करतां आला नाहीं. ही जी भाषेची असमर्थता ती आजहि कांहीं कवींना, ते अध्यात्मिक नसले तरी, प्रत्ययाला येत आहे. ज्ञानाच्या

वाढत्या कक्षेमुळें आज कितीतरी नवीन नवीन अनुभवांचे शोध लागत आहेत. वाढत्या अनुभवामुळें कितीतरी नवीन नवीन जाणीवा होत आहेत. या नव्या जाणिवा, हे नवे अनुभव सार्थपणें कसें व्यक्त करायचें हा नवकवींच्यापुढें प्रश्न उभा राहणें साहजिक आहे. वस्तुतः आधिभौतिक वास्तव जीवनांतल्या या जाणिवा वास्तव जीवनाइतक्याच ( concrete reality ) वास्तव आणि मूर्त ( real and concrete ) असल्या पाहिजेत. परंतु नवकवींच्या जाणिवा या अत्यंत अमूर्त (abstract), स्थलकालांनीं मर्यादित असणाऱ्या वास्तवाच्याहि पलीकडील अशा आहेत. भावार्थाच्या आजवरच्या अभिव्यक्तीचें जें स्वरूप आजवर ज्ञात होतें त्याच्या पलीकडच्या ह्या आहेत. तेव्हां त्यांची अभिव्यक्ति करायची कशी? साधे शब्द जसे असमर्थ तसे संकेतहि कुचकामी. साहजिक, कवीला कुठल्या तरी प्रतीकाचा आश्रय घेणें भाग पडतें. भावे यांच्या प्रतीकयोजनेची संगति ही अशी लावावी लागते. 'चालली आहे ही आगगाडी' 'विवस्त्र पांचाली' 'चोयव्या' 'वर्ये वांकला' किंबहुना जिचें नांव संग्रहाला दिलें आहे ती 'आर्द्रा' कविता प्रतीकयोजनेचे कांहीं नमुने ह्मणून सांगतां येतील. प्रतीकांच्या योजनेंतून वरच्या एका अर्थाबरोबर दुसरा एक अर्थाचा पदर अनुस्यूत झालेला सामान्यपणें आपण पहातों. परंतु भावे यांच्या प्रतीकांतून एकच कोणता तरी अर्थ व्यक्त होण्या-ऐवजीं अनेक अर्थांच्या लडी स्पष्ट होत जातात. आजचें जीवन जसें अनेकांगी आहे तसें त्यांच्या एकेका प्रतीकांतून जीवनाची अनेकांगी टीका केलेली आढ-ळते. उदा. त्यांची पहिलीच कविता 'विवस्त्र पांचाली' ही पहा. गिरणी मालकांची व्यापारी वृत्ति, विजेच्या शक्तीचा केलेला बाजारी उपयोग, गरत्या वस्त्रांचे आढ्याला भिडेपर्यंत रचलेले ढीग, साधें लज्जारक्षणहि करूं न शकणारी सामान्य दीन जनता आणि या साऱ्यावर कळस ह्मणजे भीष्म द्रोणासारखे अर्थाचे दास बनून पुढाऱ्यांनीं स्वीकारलेली तटस्थता, किंबहुना त्याचें केलेलें कायदेशीर समर्थन, इतका सारा अर्थ या लहानशा कवितेतून भावे यांनीं व्यक्त केला आहे. आजच्या व्यवहारी आणि बाजारी जीवनमूल्यावर इतकी विदारक टीका काव्यांतून क्वचितच झाली असेल. पांचालीच्या रूपकांतून सत्य, शिव, सुंदर यांनीं युक्त असलेल्या आपल्या उच्च जीवनमूल्यांच्या लाजिरवाण्या स्थितीवरहि

कवीनें पर्यायानें प्रहार केला आहे. या स्थितीची कवीला आलेली उबग सरळ नेहमींच्या पद्धतीनें (direct expression of emotion) व्यक्त झाली असती तर ती इतकी परिणामकारक झाली असती असें वाटत नाहीं. अशा प्रकारची रूपकात्मक आणि बहुअर्थप्रसू प्रतीकांची योजना करणाऱ्या कविमनाचें वैदग्ध्यहि तितकेंच असावें लागतें, आणि त्याच्या वाचकांचें मनहि तितक्या पातळीला पोचूं शकणारे तरी पाहिजें. 'चोयट्या' कवितेंतील महान् चरकाचें प्रतीकहि अशाच तऱ्हेचें आहे. परंतु पिळवणूक करणाऱ्यांच्या वृत्तीसारखीच पिळवणूक झालेल्यांची कोडगी वृत्तिहि तितकीच चीड आणणारी आहे. हीच चीड 'चोयट्या चोयट्या! बरें झालें देवा, त्या तरी निर्मिल्या।' या उपरोधात्मक उद्गारांतून व्यक्त झाली आहे. 'रस्त्याची कहाणी' मधील यांत्रिक प्रगतीपुढें नैसर्गिकतेला ध्यावी लागत असणारी माघार, 'वयें वांकला' मधील रुढींचें गलितगात्ररूप, 'चालली आहे ही आगगाडी' मधील प्रखर ध्येयवादित्व, 'दोन रक्तबिंदू' मधील यादवी वृत्ति इत्यादींचा विचार प्रतीकवादी दृष्टीनें केला ह्मणजे त्यांतील आशयाचें सामर्थ्य लक्षांत येतें. 'चालली आहे ही आगगाडी" ही कविता तर प्रतीकवादी आशयाच्या बरोबरीनें कवीच्या जीवनाविषयक दृष्टिकोणाबाबतहि महत्वाची आहे.

स्थलकालाच्या मर्यादेंतून
अचल पोलादी रूळावरून
येईल आपणा
एक दिनीं शक्ति
आणि राहून स्थलकालाच्या
मर्यादेंतहि
दिक्काल सीमांच्या
जाऊं पलीकडे

असें कवि विश्वासानें सांगतो. स्थलकालाच्या मर्यादा या बंधनकारकच आहेत. तेव्हां त्यांची मोडतोड केल्याखेरीज दिक्कालसीमांच्या पलीकडील खऱ्या वास्तवाचें, परम सत्याचें दर्शन होणार नाहीं, असें ह्मणणाऱ्या अतिवास्तववादी कवींची येथें आठवण होणें शक्य आहे. भावे यांच्या मनालाहि खऱ्या वास्त-

वाची, परम सत्याची, श्रेष्ठ अंतिम मूल्यांचीच ओढ आहे. त्या ओढीनेंच ऐहिकाच्या मोहांतून अलिप्त रहायला हवें असें त्यांना वाटत आहे. तरपिण त्यांत राहूनहि प्रगति होऊं शकेल असा त्यांचा विश्वास आहे. त्यामुळें इतर नवकवींहून या नवकवींची दृष्टि पुष्कळांना जास्त जवळची आणि जास्त निर्धास्त ( safe ) वाटण्याचा संभव. जणूं क्रांतिवाद आणि उत्क्रांतिवाद यांचा हा समन्वय आहे. भाव्यांच्या क्रांतिवादांत यंत्राबद्दलची जरी उबग असली, यंत्रानें नैसर्गिक प्रेरणांची कुचंबणा होते (रस्त्याची कहाणी) असें वाटत असलें तरी त्या यंत्राचाहि योग्य तो उपयोग केला गेला तर त्यांतूनहि ध्येयसिद्धि होईल असेंहि त्यांना वाटत असावें. स्थलकालाच्या मर्यादेंत राहूनच स्थलकालातीत जीवनमूल्यांची सिद्धि होईल हें सांगण्यासाठीं त्यांनीं घेतलेलें आगगाडीचें रूपक पहा. आगगाडी ही यंत्रयुगाचीच एक प्रतिनिधि. पण तिच्यांतच बसून दिक्काल सीमांच्या पलीकडे जाण्याची मनीषा करणें हें बरेंच अर्थसूचक आहे. वरवर वाटणाऱ्या या विसंगतींतूनहि त्यांना संगति दिसते आहे. ह्मणजे ऐहिक जीवनांत जी कांहीं आपण प्रगति केली असेल---मग ती यांत्रिक असो वा वैज्ञानिक असो— तिच्यांतूनच आपण पुढें जाऊं शकूं अशी त्यांची श्रद्धा दिसते. भाव्यांची क्रांतिकारकता ही अशा प्रकारची आहे. आस्तिकवादी दृष्टीचा हा परिणाम आहे. जीवन कितीहि जर्जर झालेलें असलें, किंवा कितीहि रोगी असलें, कितीहि विकृत झालेलें असलें, किंबहुना कितीहि सडलेंकुजलेलें असलें तरी तो रोग, विकृति वा सडकी कुजकी घाण दूर केली कीं, तें पुन्हां निरोगी होऊं शकेल हा त्यांना भरंवसा आहे. चीड, घृणा, उबग असली तरी ती जीवनाची नाहीं, त्या रोगाची वा विकृतीची आहे. अशा प्रकारचा हा आस्तिक-वादी उत्क्रांतिपूर्ण क्रांतिवाद आहे. संग्रहांतील शेवटच्या ‘आर्द्रा’ कवितेंत जणूं भावे यांचें सारें जीवनविषयक तत्वज्ञान व्यक्त झालें आहे. किंबहुना ती कविता ह्मणजे त्यांच्या काव्यसृष्टीचेंच प्रतीक आहे. आर्द्रा ह्मणजे स्थलकालाच्या विश्वावकाशाची एक चिरप्रवासिनी. जीवनांतील अंतिम चिरंतन मूल्यांवर दृष्टि अढळ ठेवीत, विज्ञानाचे मार्ग रोधून असत्प्रवृत्तींनीं थैमान मांडलें तर प्रसंगीं त्यांचा संहार करीत, सृजनशीलता कायम ठेऊं पहाणारी आणि खऱ्या जीवन-

धारांचा वर्षाव करीत आनंदीआनंद करूं इच्छिणारी अशी ही आर्द्रा आहे. दंभ, अनाचार, विग्रह, बुद्धिभेद इत्यादींनीं समाजजीवन कितीहि बिघडलेलें असलें तरी त्यांतूनहि सुखशांतीचा मार्ग निघूं शकेल अशी जी कवीला आशा वाटत आहे ती यामुळेंच. 'घे रूप आतां' आणि 'मखमली फुला'. या कविता या दृष्टीनें पहाण्यासारख्या आहेत. 'घे रूप आतां' मधील महाकालीला केलेलें सौभाग्यलक्ष्मीच्या रूपानें येण्याचें आवाहन आणि 'मखमली फुला' मधील पाशवी शक्तींच्या संहारासाठीं फुलाचेंहि झालेलें, सुदर्शन चक्र म्हणजे कवीच्या श्रद्धापूर्ण आशेच्या द्योतक आहेत. नाहीं म्हणायला, 'डोळ्यांपुढून' या कवितेंत मात्र याहून विसंवादी सूर कवीनें काढला आहे. नवनिर्मितीसाठीं सर्वसंहार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असा उबगून टाकणारा विचार कविमनाला—तें कितीहि श्रद्धा आशा यांनीं युक्त असलें तरी—केव्हां तरी चाटून जात असला पाहिजे. विशेषतः

आबादी आबाद दुनिया सारी
मानोनी गोठ्यांत
आत्मसंतुष्ट मानवी पशू
रवंथ करिती
पशू निर्मिती

हें दृश्य पाहून कवीला नारसिंहाची, महारुद्राच्या तृतीय नेत्राची वा तापहिती व्योमाची आठवण न झाली तरच नवल. परंतु सहसा अशा प्रकारच्या संहाराची सूचना भावे यांच्या कवितेंत फारशी नाहीं फार तर ते उपहास करतील, उपरोधी बोलतील, आणि त्यांतूनच आपली चीड व्यक्त करतील. उपहास—उपरोध यांच्यामुळें कवितेंत भावनात्मकता कितपत उतरूं शकेल असाहि प्रश्न मनांत येणें स्वाभाविक आहे. परंतु भावे यांच्या कवितेचें वर उल्लेखिलेलें वैचारिक स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे त्याची संगति लागूं शकेल. समाजांतील स्वार्थ, दंभ, अनाचार, काव्यकल्पनांची गतानुगतिकता इत्यादींबद्दलची चीड ही उपहासापेक्षां उपरोधांतून अधिक व्यक्त होते. 'समान साधे' 'रम्य भाविकाल' 'वठून गेला' 'चोयट्या' 'विवस्त्र पांचाली' या कविता याबाबत उल्लेखनीय

आहेत. संधिसाधूंची पोकळ ऐट पाहून

फडा काढतात शेषाच्या ऐटीनें
गांडुळें अनंत

किंवा पारंपारिक कवींच्या प्रेमाच्या खोट्या कल्पना आणि निर्जीव काव्यसंकेत पाहून

उभा गुंग कवि
प्रेमें चघळीत
षंढ सौंदर्याचीं, तत्वज्ञानाचीं
हाडकें हाडकें

असे फटकारे भावे यांच्या तोंडून निघतात.

भावे यांच्या कवितेचा आणखी एक विशेष नमूद करणें आवश्यक आहे. तो म्हणजे मनोगाहनाच्या दृष्टीनें अंतर्मनाचे पापुद्रे उलगडीत (Psycho-analytical) रेखाचित्रें काढणें. स्मृतीला association ची फार आवश्यकता असते. आणि एखाद्या गोष्टीच्या दर्शनानें मनाचा सुप्त कप्पा असा कांहीं उघडला जातो कीं त्याची आपल्याला कल्पना पण येणार नाहीं. परंतु अशा सुप्त मनाच्या तरळत्या छटा टिपून त्यांचा काव्यांत उपयोग करणें हा एक नवकाव्याचा विशेष आहे. प्रस्तुत 'अद्री' संग्रहांत अशा कांहीं कविता आहेत. 'रेशमी कळ्यां' त स्मृतीतून स्मृति निर्माण होणाऱ्या पद्धतीचा उपयोग चांगला केला गेला आहे. तर 'चिंचा' कवितेत कवीच्या सुप्त मनांत दडलेला चिंचवनांतील एक रम्य प्रसंग रेखाटला आहे. टेलिग्रॅफच्या तारांच्या झंकाराचा सुप्त मन जागें करण्यसाठीं केलेला उपयोग कलात्मक झाला आहे. गाभुळलेल्या मिठ्या चिंचेची रुची ऐंद्रिय असली तरी ती संयमित असल्यानें हृद्य आणि आस्वाद्य झाली आहे. अंतर्मनाचें विशेष परिणामकारक चित्र 'धुकें घासतें पाठ' या कवितेंत आढळतें. मनाच्या आंतल्या प्रेरणा नि नैसर्गिक प्रवृत्ति यांना योग्य ती वाट न मिळाल्यानें विकृत झालेल्या कोंडलेल्या मनाचें हें मोठें विदारक चित्र आहे. बाहेरचें निसर्गचित्र जितकें रमणीय आहे तितकेंच कोंडलेल्या मनाचें आंतलें चित्र भेसूर नि भकास आहे.

बाहेर लाविली आज चांदणी
नाज़ूक साजूक मच्छरदाणी
झोंपली तिच्यांत निसर्ग सुंदरी
चिरयौवना उर्वशीरति.

परंतु धुकाटलेल्या मनावर याचें प्रतिबिंब पडत नाहींच; उलट

आंतरव्योमांत—
काळ्याकभिन्न शुष्कस्तनी नग्न
नाचती भिल्लिणी
केशकलापांचे फेकिती पाश
तंतू तोडिती
नाजूक चांदणी मच्छरदाणीचे.

कोण हें भीषण मनोविकृतीचें नि त्यामुळें होणाऱ्या भीषण नाशाचें चित्र!

भावे यांच्या कवितेचें एकंदर स्वरूप सामाजिक असलें आणि त्याची बैठक वैचारिक असली तरी व्यक्तिजीवनांतील भावनात्मकतेचें त्यांना आकर्षण नाहीं असें नाहीं. प्रस्तुत संग्रहांत 'त्या चांदरातीं,' 'चिंचा,' 'आठवते रेषा,' 'रेशमी मोहोर' आणि 'रात्र' या कविता या स्वरूपाच्या आहेत. त्यांना सामान्यपणें प्रेमकविता म्हणतां येतील. प्रेम आणि सौंदर्य हे काव्याचे सनातन विषय आहेत. त्यावरचा विश्वास उडणें म्हणजे खुद्द जीवनावरचा आणि अखेरीस काव्यावरचा विश्वास उडण्यासारखें आहे. भावे यांनीं सांकेतिक प्रेमकविता लिहणाऱ्या कवींची, निर्भत्सना केलेली असली (वटूनि गेला) तरी ती सांकेतिकतेची आहे, प्रेमाची नव्हे. प्रस्तुत संग्रहांतील 'त्या चांदरातीं' ही एक कविता सोडली तर बाकीच्या कवितांतील प्रेमभावनेची अभिव्यक्ति अभिनव आहे. केवळ नाविन्य हाच त्याचा गुण नव्हे, तर भावनोत्कटता आणि रमणीयार्थता या दोहोंचाहि प्रत्यय त्यांतून येतो. 'रेशमी मोहोर' यांत आसुसलेल्या मनाचा घमघमाट मोठ्या धिटाईने व्यक्त केला आहे. सफरचंद आणि आम्र या फळांच्याच प्रतिमांची योजना केली असल्यानें कवितेंतील sensuous गंध जणूं त्यांतूनच व्यक्त होतो असें वाटतें. 'रात्र'

आणि ' आठवते रेषा ' या कवितांचा स्वभावहि ' रेशमी मोहोर ' प्रमाणें romantic असला तरी अभिव्यक्तीची पद्धति, पारंपारिक ( traditionally romantic ) नाहीं. इंग्रजी नवकाव्यांतील भावगीतांची ती आठवण करून देतात. ' आठवते रेषा ' तर जणूं एक रेखाचित्र आहे. तें जितकें नाजूक तितकेंच ठसठशीत आहे.

आठवते रेषा

हृद्पटीं माझ्या हळू तूं कोरली
पृथ्वी आकाश जेव्हां मिळाली.

शेवटच्या ओळींतील मीलनाची सूचकता मोठी हृद्य आहे. वैयक्तिक भावनेचा सूर आधीं लावायचा आणि मग निसर्गदृश्यांनीं तो पल्लवित करीत जायचा हा नेहमीचा शिरस्ता. परंतु येथें प्रथम कुठलें तरी निसर्गदृश्य द्यावयाचें नि त्यांतून त्यामुळेंच जागे झालेले वैयक्तिक भाव स्पष्ट करायचे, अशी ही तऱ्हा दिसते. ' रात्र ' कवितेंतहि सुरुवातीस रात्रीचें मानवी रूप वर्णन केलें आहे. पण त्या वर्णनांतूनच प्रेयसीच्या केशकलापांतून प्रियकरानें चोरटीं बोटें फिरविल्याचें सूचन, आणि

ओठ ओलसर
मृदू वर्षती रेशमी सेक

ही तुटक स्मृति, आणि अखेर ' थयथय नाचणाऱ्या ' मनमोराची प्रतिमा हीं सर्व आनंदोत्कटतेबरोबरच विकारांची उत्कंठाहि वाढवणाऱ्या आहेत. भावे यांचीं हीं भावगीतें जरी वरवर पहातां नेहमीच्या romantic पद्धतीचींच वाटलीं तरी त्यांतील प्रतिमांची योजना, सूचकता, मनोगाहनाचा उपयोग, हीं मराठींत अजून नवीन आहेत.

भावे यांच्या कवितेचें स्वरूप स्थूलमानानें अशा प्रकारचें आहे. तिच्या मागची अनुभूति जशी नवीन प्रकारची आहे, तशी तिची अभिव्यक्तिहि निराळ्या घाटाची आहे. हा एक नवीन प्रयोग नि प्रयत्न आहे. त्यामुळें रचनेंतहि अधून मधून परिचित सफाईदारपणाचा उणेपणा असल्याचा वाचकांना भास झाला तरी आशयप्राधान्य हा या कवितेचा विशेष

असल्यामुळें त्यागोष्टीकडे वाचकांचें दुर्लक्ष होतें. कारण कविता ही मुख्यतः प्रतिमांतून व्यक्त होत असते. भावे यांच्या कवितेंत या प्रतिमा पुष्कळदां प्रतीकरूप होतात. परंतु प्रतीकरूप झालेली मुख्य प्रतिमा पुनः इतर प्रतिमांनीं संपन्न आणि सुस्पष्ट होत जाते. मात्र ही कविता वरवर वाचणाऱ्यांना प्रतिमा तुटक वाटण्याचा संभव आहे. परंतु त्या तुटक नाहींत. कवीच्या आंतरमनांत त्या तरळत येतात, आणि त्या तो टिपून घेतो. कवीच्या प्रेरणायुक्त मनावर अनुभव, वाचन, अवलोकन, मनन इत्यादींनीं जे संस्कार झालेले आहेत त्या साऱ्यांच्या कांहीं एका रासायनिक प्रक्रियेतून त्या जन्मतात. त्यांच्यामागें कांहीं एक आंतरसंगति असते. कवीचें अंतर्मन केव्हां जागें होईल आणि सूचक नि अर्थपूर्ण प्रतिमांचें दर्शन देईल हें स्वतः कवीलाहि सांगतां येणार नाहीं. भावे यांनीं याबाबत बरच यश संपादिलें आहे. 'रम्य भाविकाल' मधील काळ्या ढगांत लपणारा प्रकाश, हत्तीच्या सोंडेचें नळकांडें, त्यांतून फेकलें जाणारें पाणी, जमिनीवर कुत्र्यांच्या छत्र्या, आणि मांडुळांनीं आणलेली शेषाची ऐट ही प्रतिमांची मालिका पहा. किती अर्थवाहक आहे ती. भावे यांची सारी कविता अशा प्रतिमांनींच व्यक्त झाली आहे.

प्रतिमांची निर्मिति ही कल्पनांच्या वा संस्कारांच्या गोतावळ्यांतून ( association of ideas ) होत असते. हा गोतावळा जागृत मनाला नेहमीं माहीत असतोच असे नाहीं. अंतर्मनांत तो कुठे तरी दडलेला असतो, आणि विस्मृतीनें त्यावर पडदा टाकलेला असतो. तो पडदा केव्हां, कसा आणि कुठें दूर सारला जाईल हें कवीसहि कळणार नाहीं. पण तो दूर झाला आणि प्रतिभेनें आपला प्रकाश टाकला कीं आंतली प्रतिमासृष्टि एकदम चमकून दिसते. ही एक क्षणच चमकून गेलेली प्रतिमासृष्टि जशीच्या तशी टिपून ती व्यक्त करण्याचा नवकवीचा प्रयत्न असतो. मात्र अशा प्रयत्नानें नवकवितांची अभिव्यक्ति जास्त जास्त वैयक्तिक (individualistic) होऊं लागली आहे. नवकवींची ही वैयक्तिकता म्हणजे स्वतःच्या सुखदुःखाची त्याच त्या अतिपरिचित शब्दांत नि संकेतांत व्यक्त झालेली आळवणी नव्हे. तर ती एक प्रकारची वैयक्तिक प्रतिक्रिया आहे. सामाजिक परिस्थिति आणि वैयक्तिक प्रेरणा यांच्या संघर्षातून व्यक्तिमनावर उमटलेली हीं क्षणचित्रें आहेत. ती भावपूर्ण आहेतच; पण तींवर कवीच्या व्यक्तिमत्वाचा

जास्त छाप आहे· याचा साहजिक परिणाम ह्मणजे ही कविता सामान्यतः दुर्बोध वाटते. शब्द, अर्थ, संकेत इत्यादींमुळें कवि आणि वाचक यांच्यांत जो पारंपारिक परिचय असतो, तो येथें रहात नाहीं; तो करून घ्यावा लागतो. परंतु एकदां कां तो आपुलकीनें करून घेतला की त्यांतली काव्यसृष्टि सुस्पष्ट होत जाते. नवकविता ही नव असली तरी कविता आहे· मात्र ग्रहआग्रहांचे, समजगैरसमजांचे, सांकेतिकतेचे आपल्या दृष्टीवर जे पडदे आलेले असतात ते दूर करायला पाहिजेत; आपली दृष्टि आणि कवीची दृष्टि एकमेकांना भिडली पाहिजे; दोन हृदयांत संवाद निर्माण झाला पाहिजे.

अनेक काव्यप्रकाराप्रमाणें आणि त्यामागच्या कल्पनाप्रमाणें नवकाव्य हेंहि पाश्चात्यांच्या वाङ्मयपरिशीलनांतूनच मराठींत आलेलें आहे. साहजिकच त्याचा स्वभाव, त्याचें स्वरूप, अभिव्यक्तीची पद्धति इत्यादिकांत अधून मधून पाश्चात्य वळण उतरलें आहे. इंग्रजींतील आज प्रसिद्ध असलेल्या नवकवींनीं जे निरनिराळें प्रयोग चालविले आहेत त्यांचाहि पडसाद थोडाफार आपल्याकडे उमटणें शक्य आहे. पाश्चात्य वाङ्मयांत जे अनेक वाद उत्पन्न होत आहेत (उदा. Surrealism, Dadaism, Existentialism, Nihilism इत्यादि) आणि त्यांच्यामागें जी तत्वप्रणाली आहे त्यांचाहि ते वाचणाऱ्यांच्या मनावर परिणाम होणें शक्य आहे. आपल्याकडचे नवकवि या साऱ्यांची उचल जशीच्या तशी न करतां त्या दृष्टींतून आपल्या जीवनाकडे पहाण्याचा प्रयत्न करीत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. अर्थात् त्या त्या नवकवींच्या प्रकृतिभेदानुसार त्यांचें काव्य भिन्न भिन्न प्रकारांनीं अभिव्यक्त होत आहे· परंतु आपल्या जुन्या काव्यपरंपरेहून हें नव्यकाव्य आणि त्यामागचे विचार वा भावना हीं भिन्न असल्यानें तें अजून लोकप्रिय होऊं शकत नाहीं असें दिसतें. परंतु भावे यांच्या या नवकवितेबाबत निराळा अनुभव येईल असा भरंवसा वाटत आहे. कारण भावे यांच्या काव्यांत जरी पाश्चात्य नवकाव्याच्या प्रवृत्तीचा नि अभिव्यक्तीचा थोडाफार परिणाम (influence) आढळत असला तरी त्यांत भारतीय संस्कृति आणि भारतीय तत्वज्ञान यांच्याहि छटा पुष्कळ आढळतात· तसेच 'भीष्मद्रोणकृप अर्थाचे दास', 'विवस्त्र पांचाली', 'सुंदोपसुंद', 'शुभपदमुद्रा' इत्यादि पौराणिक आणि प्राचीन मराठी वाङ्मयांतले जे उल्लेख

आढळतात ते केवळ वाङ्मयीन ( literary allusions ) म्हणून येतात असें नाहीं, तर ते आपोआप त्यांच्या काव्यसृष्टीचा एक भाग ( organic ) म्हणूनच जन्मतात. त्याचप्रमाणें 'धुके घासतें पाठ' 'तमानें पेटला' 'थंडी जाळतां' 'फुटे आकाशाचे भिंग कोडकन्' अशाप्रकारचे नवीन, पण अर्थपूर्ण शब्दोद्गारहि ( expressions ) काव्याची खुमारी वाढवतात.

आज मराठींत नवकाव्य म्हणून जें थोडेसें काव्य लिहिलें जात आहे त्यांत प्रस्तुत 'आर्द्रा' या संग्रहानें भर पडत आहे. नवकाव्याच्या गुणविशेषांनीं 'आर्द्रा'तील कविता जशा इतर नवकाव्याशीं साधर्म्य दाखवीत आहेत, तशाच त्यांच्या कांहीं विशिष्ट प्रकृति धर्मानें त्या इतरांहून भिन्नहि आहेत. यांत्रिक आणि वैज्ञानिक प्रगतीमुळें समाजाच्या भौतिक जीवनांत जी एक अवस्था निर्माण झाली आहे तिच्याविरुद्ध या कवितेंतहि एक प्रकारची प्रतिक्रिया आहे. परंतु या प्रतिक्रियेत निवळ भंजकता नाहीं, तशीच अगतिक भोगवादी वृत्ति नाहीं; घृणेची अत्यंतिक तिडीकहि नाहीं किंवा केवळ मनोगाहनी पद्धतीची अतिरिक्तताहि नाहीं. किंबहुना या सर्व गोष्टी थोड्याफार प्रमाणांत असूनहि एक निराळ्याच प्रकारचा आस्तिक्यवादी आशावाद प्रस्तुत कवितेंत आहे. स्थितिगतिकृति याच्या समन्वयांतुन म्हणजे स्थलकालाच्या बंधनात राहूनच स्थलकालाच्या पलीकडील अंतिम मूल्याची सिद्धि होईल अशी कवीची श्रद्धा आहे. 'आर्द्रा' या कवितेंत म्हटल्याप्रमाणें बौद्धिक वा वैज्ञानिक प्रगति जीवनप्रेरणांच्या म्हणजेच नैसर्गिकतेच्या आड येऊं लागेल तर बौद्धिक प्रगतीचा संहार करण्याची जशी तयारी आहे, तशीच सृजनात्मकतेची उपासना करण्याचीहि तळमळ आहे किंबहुना तिच्यासाठींच संहाराची तयारी. परंतु हा संहार जीवनाचा नव्हे तर जीवनांतील विकृतींचा. अशा तऱ्हेचा हा जीवनावरती आस्तिक्यपूर्ण श्रद्धा असणारा उत्क्रांतिवादी क्रांतिवाद आहे. अर्थात्, प्रस्तुत काव्याचा हा गाभा आहे. त्यांतून निर्माण होणारीं प्रतीकें आणि प्रतिमा निःसंशय काव्यमय आहेत. जरी मधून मधून उपरोधांचे चिमटे बसत असले, किंवा क्वचित् तडितेचा आघात होत असला, किंबहुना कालिकेचें रौद्र दर्शनहि होत असले तरी अखेर त्या साऱ्यांतून जीवनदायी 'आर्द्रा' चाच वर्षाव होईल आणि रसिकांची तृषित हृदयें संतुष्ट होतील असा विश्वास वाटतो. प्रा. भावे यांच्या 'आर्द्रा'चें रसिक वाचकांकडून स्वागत होईल अशी आशा व्यक्त करून ही लांबलेली प्रस्तावना पुरी करतों.

'सुखनिवास'<br>
टिळकवाडी, बेळगांव.

**गं. ब. ग्रामोपाध्ये.**

## १ विवस्त्र पांचाली:—

भव्य गिरणींत—

गिरकी फिरकी लहान मोठ्या
पोलादी चक्रांची.
वीजेची शक्ति
मिचकाविते बाजारी नेत्र.
कळ दाबतां बिजली नाचे
धोट्यांवरती
आणि ते विणती
वस्त्रें गरतीं
शीग जयांची चुंबिते आढ्याला भव्य गिरणीच्या.

पण बाहेर—

दांत विचकीत होती हांसत
काळी काळी रात;
काळाकुट्ट पक्षी अणकुचीदार
फाळ खुपशीत
होता उडवीत
रक्ताचें कारंजें....

मानवी मनाच्या  जखमेंतून
आर्त आक्रंदन—
"भीष्म द्रोण कृप
अर्थाचे दास
विवस्त्र पांचाळी!
विवस्त्र पांचाली!!"

---

## २ एक चित्रः—

अनंत शून्याच्या
पोकळीमाजीं
तमानें पेटला  चंद्रमा दुबळा
तिमिर स्फुल्लिंगें
संतत वर्षतो
आणि पृथ्वीला
दीन विनवितो—
"दे दान, दे दान, सुटूं दे गिराण!"

---

## ३ वठूनि गेलाः—

भेसूर भकास—
वठूनि गेला  फोल जाहला
वाळला वृक्ष
सुरकुतलेल्या  अस्थिहस्तांनीं
बलात्कार करी
आलिंगनाचा
पिता मानुनी  आश्रयीं आलेल्या
लतिकेवरी,
निर्व्याज सौंदर्यें  पूर्ण भरलेल्या.
— आणि जवळी
उभा गुंग कवि
प्रेमें चघळित
षंढ सौंदर्याचीं  तत्त्वज्ञानाचीं
हाडुकें  हाडुकें !

———

## ४ चोयट्या:—

महान् चरक पिळून काढतो
कणाकणांतून
ताजी तवानी उसाची सृष्टि,
ढीग रचतो
हिमालयापरि
शुष्क चोयट्यांचा !

रस पिणारे जिभल्या चाटती
अभावें हांसती
खदाखदां गाती
"निर्जीव चोयट्या !
शुष्क चोयटया !!"
पण कांही पान्थ, चोपटलेले,
पूर्ण पिळला रस ज्यांतून,
थंडी जाळतां रातच्यापारीं
जाळिती चोयटया, शुष्क चोयटया, उसाच्या चोयटया
आणि नाशती थंडीचा दाह
आणिक ह्मणती गदगदत
"चोयटया ! चोयटया !
बरें झालें देवा
त्या तरी निर्मिल्या !!"

---

## ५ मनींचें मांडे:—

सूर्याचे सोनेरी प्रकाश किरण
सहज चुंबती मेघमालिका—
रंगीबेरंगी
इंद्रधनुष्यें
आकाश हासे अणूअणूंतून,
"सुखा नच तोटा!"

+ +

पृथ्वीचे धूसर 'गिरण किरण'
चुंबचुंबती मेघमालेला—
काळाकभिन्न
राठ दाट तम
आकाश बिवळे अणूअणूंतून,
"मनींचे मांडे
मनांत विरले!"

---

## ६ रम्य भाविकाल:—

प्रकाश घुबड  अंग चोरतें,
काळ्या ढगांच्या  खबदाडांत
बिळांत लपतें.
ढग दाटतात—
हत्तीच्या सोंडेचें  लांब नळकांडें
पाणी फेंकतें.
उघडतात
कुत्र्यांच्या छत्र्या.
फडा काढतात
शेषाच्या ऐटीनें  गांडूळें अनंत
डोलत गातात,
" रम्य भाविकाल ! "

---

## ७ समान संधीः—

-१-

पायाखालीं. निसरडी
        चिखलाची पायवाट
दोहीं बाजू  घनदाट
        सर्पवनांचा  फुम्फाट

-२-

व्योम ओकें तमधारा
        सर्पवनें विषधारा
खचे बुडे खोल सारी
        दीन वाट भरभरी

-३-

चिखलांत बुडायाची
        गिळे सर्वां भीति काळी
सर्पक्षुधा  शांतायाची
        मिळे सर्वां समसंधी !

---

## ८ धुकें घासतें पाठः—

-१-

मनगवाक्षाच्या      बिलोरी दारीं
घाशीत आहे      जोराजोरानें
धुकें राट दाट
आपली पाठ.
धुकाटलें मन      गेलें कोंडून—
धुकें रानवट      घासतें पाठ.

-२-

बाहेर लावली      आज चांदणी
नाजूक साजूक      मच्छरदाणी.
झोंपली तिच्यांत      निसर्ग सुंदरी
चिरयौवना      उर्वशीरति
कपोलावरी      खुसखुसतें
जादूचें हास्य
निळें हिरवें      हिरवें निळें
शुभ्रांत मिसळें.
पण रानवट      धुकें घाशी पाठ
बिलोरी दारीं
मनगवाक्षाच्या

-३-

प्रकाश आधीं   कोंडून ठेवला
खोल पुरला
मनतळघरीं
कवडीचुंबक   जैशीच संपत्ति.
तक्षक भुजंग   तोच प्रकाश
ओकत विष   वेटोळलेला—
मनपरिक्षिती   कळवळला.
धुकें रानवट   घासतें पाठ.

-४-

बाहेर लावली   मच्छरदाणी
चांदणी चांदणी
सौंदर्याची पूर्ति.
अंतर्व्योमांत....
काळ्याकभिन्न, शुष्कस्तनी, नग्न
नाचती भिल्लीणी—
केशकलापांचे   पाश फेंकिती
तंतू तोडिती
नाजूक चांदणी   मच्छरदाणीचे.
मन गवाक्षाच्या   बिलोरी दारीं
धुकें रानवट   घासतें पाठ!

———

## ९ अचानक:—

आकाशाचें भिंग
फुटें काड्कन
वाटलें पडेल
विनाशाची वीज

÷

पण अचानक—
भर्भर झर्झर
पांढरे शुभ्र
जीवन मोती!

———

## १० कणीस:—

चुकून पडलें
बियाण रुजलें
कोंब फुटले....
कणीस भरलें
वाऱ्यांत नाचलें
आकाश हंसलें!

———

## ११ रस्त्याची कहाणी !

पर्णकुट्यांच्या ओळींमधुनी
रस्ता पळतो लालमातीचा
आजूबाजू गांगरताती
हिरवीं गवतें थरारतातीं
पण तो रस्ता धावधावता
वेड्यावाणी सैरावैरा
ठेंचाळूनी खालीं पडतो
काळ्याकाळ्या पोलादाच्या
कांबीवरती आगगाडिच्या
आणिक आपुली मान वळवितो
धूलिकणांचे अश्रु ढाळितो

— —

## १२ तेवढाच स्थिर प्रकाश-किरण

वारा भरारतो   विकट हांसतो.
कालवाकालव
ढवळतें चित्त   वाट चुकल्या मुशाफिराचें
प्रकाशझोत   निळ्या भिंतीवर
दा वि तो   चि त्रें—
मेनका अप्सरा   लागते पायीं
विश्वामित्राच्या,
"नको वृथा त्यागूं
तुझी कन्यका!"
दीन शकुंतला थबथबलेली अश्रूजलांनीं
आणि दुष्यन्त
अदय उद्गारे,
"कोणाची तूं पत्नी?"
दारूच्या सुरया   धुंद मदिरा
झिरझिरीत   रेशमी साड्या
अन् छुमछुम,
"लूट आज मजा!"
अपूर्णतेच्या देहसुखाच्या बेहोष विश्रांत.

प्रकाशाचा स्रोत
निळ्या भिंतीवर
सरकतीं चित्रें एकामागें एक
पण मध्येंच जीवन्मृताच्या—
अंतर्मनांत
का ळ्या पा प ण्या
ज्या मागें नाचती तारकाकिरण
मृत्यूरेषेमागे नाचतें जीवन
तेवढाच स्थिर
प्रकाशाकिरण
वाट चुकल्या मुशाफिराच्या
बेहोष विश्रांत !

---

## १३ चालली आहे ही आगगाडी:—

चालली आहे   ही आगगाडी
      झुकझुकत भकभकत
चकचकीत अचल पोलादी रूळांवरून
      झर्झर भर्भर
गतकालाचें जीर्ण क्षितीज मागें टाकून
      भाविकालाच्या क्षितिजाकडे
चालली आहे ही आगगाडी.

+ +

वाफ तापली   श्वासते सतत
दाट धूम मेघ   ऊष्ण उसासत
      ओघवती ती
      गुंगली तालांत
      वेगांच्या गानांत
      चाकांच्या तालांत
नाही तमा तिला दुज्या कशाचीहि
      ही धाव मारते
भाविकालाच्या क्षितिजाकडे

+ +

आकाश-गवाक्षीं हळू डोकावून
लाल लाजेंत बुडाला अरुण
पहांट-वाऱ्याची वीणा घेऊन
अस्फुट करतो प्रेमाराधन,
पण ... .... चालली—
ठक ठक ठक धड धड धड
भगभगत बेफामपणें
ही वेगवती
भाविकालाच्या क्षितिजाकडे

+ +

डामडौलांत फडकावीत फड्क फड्क
लाल भडक
कीर्ति-पताका
राजाधिराज येतो सूर्यराज
किरण-पुष्पें उधळवीत
मदन-गीत धुंद आळवीत
पण .... .... चालली
धडाड धडाड
भाविकालाच्या क्षितिजाकडे....
+ +

हिरमुसला अवमानित
अंगारकरूप रुद्र आदित्य
प्रेमनिराशेचा सूड घेतो जणूं
अदय माध्यान्ह—
कळवळते ती उन्हाच्या ज्वाळेंत.
गगनभेदक आर्त आरोळी
असहाय्य शीळ
निघते तिच्या शुष्क मुखांतून;
पण ... न थांबता—
भाविकालाच्या क्षितिजाकडे
अचल पोलादी
रूळांवरून
धावे आगगाडी
+ +
रजनी येते—
चंद्र झुरतो काळवंडतोहि
प्रेमविव्हल निस्तेजतात काजवे तारे
पण तमा हिला नाहीं कशाची
धावे ओघवती
भावि कालाच्या क्षितिजाकडे
+ +

अधूनमधून—

भिजवे पर्जन्य    ओर्ली चिंब चिंब

जाळतें उन्ह    घोर हाय आग!

कुडकुडवितें,    निघृण थंडी....दीन हुडहुड.

अधूनमधून—

आकाशीं उभीं    इंद्रधनुष्यें

सप्तरंगींकरें

हळूच कोमल    गोंजारतात.

धरणी माता    देते गोड खाऊ

पिकल्या फळांचा

आणि खेळणी

फुलतीं फुलें.

अधूनमधून—

प्रकाश दावितो    नवीन वाटा

आणि काळोख    भीषण भीतीचा

बागुलबोवा.

नाहीं थांबत    पण ही बिजली

भाविकालाच्या क्षितिजाकडे    चालली चालली.

\+ +

कशाच्यासाठीं ? पोटखळगी भरण्यासाठीं ?

काय ध्येय तिचें ?

दिसतें काय,

दूरदर्शक दीपनेत्रांना तिच्या तेजस्वी ?

दिव्य प्रकाश ?

कोणची आशा ?

सौंदर्यस्वप्नांची सत्त्वपरिणति,

शिवपरिपूर्ति ?

यासाठींच कां

बेफामपणें ही

धावे आगगाडी ?

\+ +

थांबेल कधीं, थांबेल कोठें ?

आहे तिला कां विश्रामस्थान ?

आहे तेथें कोणी. पूर्णस्वरूप

वाट पहात एकला उभा शिणल्या नेत्रीं ?

कशाला धावते,

जन्मापासून

न जातां मोहून

न स्तब्धावता

फेंकत मागे,

जुनेंपुराणें गतकालाचें जीर्णक्षितिज

वर्तमानांतून

भविष्याकडे

कशाला धावते ही आगगाडी?

\+ +

भूत, वर्तमान, भविष्यकाल,

यांचा चालतो अनंत झपूर्झा

धांवते यांची सदा आगगाडी,

कालाकालांच्या जन्माजन्मांतून

हा ताळमेळ

गांठण्यासाठीं....

धांवते कां ही?

आशा कदाचित् —

कालयुगांचा असंख्य स्थलांचा
राहिलों जर असाच सतत प्रवास करीत
स्थल कालाच्या मर्यादेंतून
अचल पोलादी रूळांवरून
येईल आपणां
एकदिनीं शक्ति,
आणि राहून स्थलकालाच्या मर्यादेंतहि
दिक्काल सीमांच्या
जाऊं पलीकडे.

यासाठींच कां—
झुकझुकत भकभकत
सोडे वाफ धूर
झर्झर भर्भर धांवे आगगाडी
यु गा यु गां तू न
ही आ ग गा डी ?

——— —

## १४. वयें वांकलाः—

-१-

वयें वाकला दाढीवाला
काठी टेकित कुठें निघाला ?
पिकलें पर्णचि भिरभिरलें
हसें बोळकें गवत वाळलें

-२-

दो डोळ्यांना भग्न चाळिशी
मिण् मिण् मिण् मिण् वाट दाविते
मनोभूमिवर तूर वाळला
पवनावरती हले खुळखुळा

-३-

जन्मभरींची अंध अनुभूती
सुरकतली कीं चेहऱ्यावर्ती
सोबत नुरली दुजी कशाची
फक्त वांकड्या त्या काठींची

-४-

कुठुनी आला, कुठें चालला,
अडखळणारा काठीवाला ?
मिणमिणाऱ्या मावळतींत
ढवळा ढवळा कापुस पिंजला !

---

## १५ विव्हल पक्षी:—

-१-

चंद्रकोर भव्य भालीं—

रातराणी पातली

मरुतानें आळवितां

गोड गालीं हांसली.

-२-

नीलपर्णे झांकलेला

मार्ग जाई दूर दूर

एक पक्षी घरट्याचा

शोध घेई भिरभिर.

-३-

भिरभिरे निरुत्साहें

फडफडे तो विव्हल

विरे त्याची हांक आर्त

मरुताच्या झुळकींत.

---

## १६ दोन रक्तबिंदूः—

एका नसेंतील एकाच एकाच
दोन रक्तबिंदू
एकमेकांकडे तांबरल्या नेत्रीं
लागले पाहूं
उष्णतामान तयाचें वाढलें.
सळसळली
सूडाची दारू डोक्यांत चढली.
सुंदोपसुंद जणूं आसूसले
दोन रक्तबिंदू हिंस्त्ररूप झाले
सूडधुंदींत नसमर्यादा
तोडून फोडून
खालीं कोसळले.
आणि पृथ्वीमाता
घेई दोघांनाहि
घेई आपुल्या मऊ अंकावरी
"या .... माझ्या .... बाळांनो!"
तिच्या अंकावरी
निद्रिस्त झाले
मिसळोनि गेले
सूडाच्या ईर्षेनें
बेभान झालेले
दोन रक्तबिंदू!

## १७. रात्रः—

अंधुक अंधुक
लुकलुकती मोतियाचीं फुलें
अधूनमधून
लांबसडक काळ्याकाळ्याभोर
केशसंभारांत
मुक्त सोडलेल्या
तारा तरलल्या
दिलरुब्याच्या
वायू ज्यावरी फिरवी आपुली
बोटें चोरटीं.
यामिनी सुषमा जागली हासली.
जागती हांसती—
ओ ठ ओ ल स र
मृदु वर्षती रेशमी सेक
धुंद तुषार....
—आणि थयथय
नाचतो मोर
मन उपवनीं !

---

## १८. रेशमी मोहोरः—

-१-

सफ्फरचंदी गाल जियेचे

आणि नाचते नेत्रजलावर

पाड लागल्या आम्रफळांची

सतेजता अन् आतुरता.

-२-

ऐशी कोणी सहज पाहिली

आणि लागला मन-आम्राला—

इकडे तिकडे आसुसलेला

थरथरणारा रेशमी मोहर !

## १९. त्या चांदरातीं:—

मंदसंथ तो अनिल
श्वासे सुगंध तरल
चंद्रचोर चुंबे मधु
पृथ्वीप्रिया हांसे मृदु.
तू उभी मजजवळी
गालीं आली लाजकळी
मंद धुंद श्वासे तनु
रातराणी वेल जणूं
भिरभिरले पारवे
दोन तुझ्या नयनांचे
पृथ्वीकडे चंद्राकडे
नि हळूच माझ्याकडे.
कैक दिन आसुसला
जीव मम फुलारला
नेत्रगूढ उमगलें
चंद्रासी गुरु मानलें.
हास्य घुमे लास्यगीत
आकाशांत अवनींत
दोन जीव एक सरीं
आणितसे चंद्रचोर.

———

## २०. मखमली फुलाः—

सुवास बागेंत      उमलल्या फुला,
        मखमली फुला,
उषेची सुषमा      साकार जाहलीं
        तुझ्या पाकळ्यांत.
पाहुनि तुला      वाटलें मनाला—
कोमल प्रभातीं      सूर्यकिरणांशीं
यामिनी समयीं      चंद्रकिरणांशीं
        खेळशील झिम्मा
आणि अमूर्त      संवेदनस्वप्नीं
        जाशील विरुन
        मखमली फुला !
पण घेतलेस      मखमली फुला
        नाजूक फुला
रूप चक्राचें      सुदर्शनाचें
    पाशवी शक्तीच्या
    संहारासाठीं
सहाय्य झालासी      थोर विष्णुकार्या.

पर्जन्य ओकली अंधारी रात
आणि खचला पायाखालचा
मार्ग एकदम
...प्रळयकाळ !
अनपेक्षित मखमली फुला
केलीस किमया
आळविलास गंधसुवासें
जणूं दीपराग
आकाशदीप उघडूं लागले
आपले नेत्र
दिसो लागे मार्ग ! !

---

## २१. तुझ्या स्मृतीला:—

रखरखीत भीषण चंडांशु
जाळतो पोळतो
धरणी बद्ध.
भोंवतालीं तिच्या
धुळीची स्फुल्लिंगें
कोरडा वारा अग्नीच्या झळया.
पण चटकन्—
दिधलेंस दान
हिमापरि शुभ्र शांत तपस्येचें.
वर्षलें आकाश अमृतधारा.
धरणी स्वतंत्र
हंसलीं फुललीं फुलें सुमनें.
झाली ध्येयपूर्ति !

+ +

मंद वायूची तरल सुगंधी
नाजूक झुळूक
स्वर्गबनांतून अभावित आली.

उश्वासिला तिनें      अमृत मंत्र

जागवावया      मानवपुष्पाच्या

मरणामधील

शिव अमरत्व

आणि परतली

ती उपवनांत

चिरंतनाच्या.

पण ती स्मृति—

सुगंधी तरल

मंद वायूची

अमृत मंत्राची

जाणीव तिची      दाबून टाकली

जरि दिवसां,

येईल परत      येईल परत

निदान खास

रात्रीच्या वेळीं

जागृति निजतां      सुषुप्ति जागतां....

झु ळू क सु गं धी !

——— —

## २२. रेशमी कळ्याः—

चोरटा वारा गुदगुदल्या हळूंच करतो
जलशरीराला
आणि फुलतात अंगावरी त्याच्या
रेशमी कळ्या.
जाणीव निजते बाह्य जगताची,
आणि माझें मन
लागतें भराऱ्या
डौलाचें पांखरूं
गतकालाच्या सीमा ओलांडून कालतत्त्वांत
आ णि आ ठ व ण....
शांत चांदणें सुखविणारें
गुलाब पाण्याच्या मंद लहरींतून.
क्रीडाभूमीवर निळ्या आकाशाच्या
पांढरीं वस्त्रें लेऊन सान
जलद लहान
दोन कळ्या जणूं
रेशमी कळ्या
बागडतात ऊब घेतात
चंद्रकिरणांची.
स्मृति जयाची—
मूर्तीकाराच्या लोखंडी छिण्णींत

कालिदासाच्या निर्जीव टाकांत
तानसेनाच्या यांत्रिक गळयांत
ओपते जीवन;
आणि वाहतो
विद्युत् प्रवाह—
कोरले जातात अमर्त्य अमर
कलाशिलालेख.
स्मृति जयाची—
थोर महात्म्यांच्या तरल मनांत
उजळविते
भविष्यकालाचीं सृजनशील
उदात्त स्वप्नें.
स्मृति जयाची—
पिढ्यान्‌पिढ्या धरती मातेच्या
मानवी कालाच्या जन्मापासून
शरीरमातीच्या
रोमारोमांतून अणुरेणूंतून
फुलविते कळ्या
कधीं केव्हां तरी
जशा अभावित आज फुलल्या
जलतनूवरी
मनतनूवरी
रेशमी कळ्या! रेशमी कळ्या!

## २३. गंजून चालली:—

गंजून चालली
पोलादी कांब वांकून गेली.
इमारतीची फें फें उडली
जमीनीवरती कोसळण्याची
भीतिजाळते मनामनांतील
अणूं अणूंना !
काळ्या जाळ्यांनीं मनधुराडें
कांठोंकांठ भरे.
इवली ठिणगी जिवंत ठेवली
विझून चालली.
धुराची जाळीं छाताडीं बसून
गळा दाबती.
गुदमरविती गंजली ठिणगी.
जगवावयां आजवारि तिला
केला आटापिटा.
गंजली ठिणगी विझून चालली
पोलादी कांब वांकून गेली.
ये झणीं पवना ये झंझावाता
वीज आण संगें

लाव उडवून
टाक जाळून
धुराची जाळी.
कर ठिणगीची भडकती ज्वाला
कदर न मला जरि बळी माझा !

---

## २४. आठवते रेषा:—

व्योम सागरांत डोलें चंद्र शीड.
लाजऱ्या नदीच्या हृदयावरी
वायू चंद्ररेषा हळूंच कोरी.
जाईची कळी
सरिता हंसली !

+ +

चिंधावलें शीड करी फडफड
प्रकाशगृहाच्या स्मृतिकिरणाच्या
अनुरोधानें....
....आ ठ व ते रेषा
हृत्पटीं माझ्या हळूं तूं कोरली
पृथ्वी आकाश जेव्हां मिळाली.

---

## २५. रातराणीची सुमनें मेलीः—

-१-

उजाड भकास    माळावरती
पडक्या झडक्या    भिंतीजवळीं
भालू घुबडें    गाणीं गातीं
किर्रर किर्रर    रात्र रडते
तमदेवाचें    हृदय भंगनें

-२-

अन् विस्फारल्या    झाल्या ओल्या
काळ्या काळ्या शार पापण्या....
गगनविहारी    पक्षाचे जणूं
सरीसरींनीं    पंख भिजविले

-३-

आणि मोडक्या रेडिओंतुनी
तरलत उठल्या  दीन लकेरी—
  "नऊदहाची लोकल चुकली
  निवडुंगाच्या काट्यामध्यें
  पडक्याझडक्या भिंतीजंवळीं
  रातराणिची सुमनें मेली!"

———

## २६. डोळ्यांपुढून:—

डोळ्यांपुढून        चलच्चित्रपट—
        मनांत निराशा
        डोक्यांत चिंध्या
        अंगावरीं चिंध्या
स्थिर ध्रुवाविना भटकणारा
        दोन पायांचा
        सां प ळ्यां चा ज था !
डोळ्यांनीं पहातों—
घाम रक्त अश्रू   ज्यांतून जाती
                प्रतिबिंबीती
                परावर्तती
                वक्री होऊन
यांत्रिक किरण   अणूकिरण ;
        आणि जन्मती
असंख्य धनुष्यें   रक्ताळलेलीं
                घामेजलेलीं.
आणिक पाहतों—
आबादी आबाद   दुनिया सारी
        मानोनि गोळ्यांत

आत्मसंतुष्ट        मानवी पशू

        रवंथ करिती

        पशू निर्मिती.

आणि उठतात—

विव्हळणारीं    कर्कश भेदक कैक वादळें.

आठवण येतें    मन जाळीत----

        तडिताघातांची

        नारसिंहाची

महारुद्राच्या    तृतीयनेत्राची

        अणूस्फोटकाची

'ताहिती' व्योमीं  गर्दी करणाऱ्या लाल ढगांची

                आणि ओकणाऱ्या

                र क्ता च्या झ डी ची !

———— —

## २७. जगशांतीची करा निर्मिती !—

पिवळ्या पिवळ्या प्रासादाच्या
काळ्या शिसवी मेजावरती
फसफस सळसळ सळाळताती
मादक मादक मधुरा मदिरा.
मउ पंखांच्या सोफ्यावरती
मखमलवाल्या फिकट बाहुल्या
मेदमूर्तिंना धष्टपुष्टल्या
बाहूपाशीं आवळताती.
आणिक सगळ्या गुदमरलेल्या
घुसमटलेल्या मेद आकृति
पडल्या पडल्या जीभ उचलती—
"ज ग शां ती ची क रा नि र्मि ती!"

## २८. माथ्यावरती:—

माथ्यावरती डंवरलेलीं
तारापुष्पें निळी हासलीं
दंवबिंदूनीं थबथबलेली
हिरवी मखमल पायाखालीं—
आणि पांढऱ्या निळ्या निकटच्या
खांबामधुनी टेलिग्राफच्या
लहरी उठती आवाजाच्या
तरलत जाती नदीकांठच्या
अनुरोधानें चिं च ब ना च्या....
आणि मनाच्या मखमालिवरती
मिठ्या चिंचा झर्झर पडती
मिठ्या चिंचा गा भु ळ ले ल्या
हातांनी तूं मोहरलेल्या
माझ्यापासुन लुटुन घेतल्या!

## २९. जलबियाणें:—

-१-

इकडे वाळू तिकडे वाळू चोहींकडे वाळू
रखरखित लाल तापलेली
क्षितिजापर्यंत सपाट वाळू!
हाडाचा सापळा पंख जळलेला
बिचारापक्षी
संपाति पक्षी
तहानलेला पिपासेनें आर्त
वाळूचा कण वाळवंटांत—
आग लागल्या आकाशाकडे
शुष्क आवाजे भीक मागतो चिवचिवतो,
"दे जल बिंदू... ...
धरूं दे टीप गाऊं दे गाणें.
भेसूर भीषण मरूभूमीचे
होऊं दे होऊं दे
शस्यशामल
नंदनवन.
दे जल बिंदू दे जल बिंदू."
पोळलें आकाश सोडतें उसासे----
"थांबथोडेसे थांब थोडेसे.

पृथ्वीवरून
येऊं देत वर जलबियाणें.
होऊं दे पेरणी जलबियाणांची,
माझ्या भूमींत.
येईल मग अनुपम पीक
जलमोत्यांनीं तुडुंब भरली
मेघ कर्णासें
वायू हलवील
जलमोत्यांचा ढीग होईल
पृ थ्वी व र तीं.
आणि भकास वाळवंटाचे नंदनवन.

आणि फुटतील नवीन पंख
येईल शक्ती गगनामध्यें
विहरण्याची
नको निराशूं.

थांब थोडेसें येऊं देत वर
जलबियाणें पृथ्वीवरून."

+ +

थांबतो पक्षी संपाति पक्षी
पिपासेनें आर्त पंख जळलेला विचारांत मग्न....
" पृथ्वीवरून कोण पाठवील
जलबियाणें--
स्यमंतक-मणीं
फाडून पोटें मणी गिळलेल्या जांबुवंतांची ?
कधीं पडतील सरीवर सरी
जलमोत्यांच्या ?
आणि होईल वाळवंटाचे नंदनवन ?
कां होणार वाढ.... .... ....
वाळूच्या कणांची
वा ळ वं टां त ? "

---

## ३०. ताजमहालः—

ढगाचें जाळें व्योम आच्छादतें
आणि पकडतें
चांदण्या मासोळ्या
तडफडती त्या फडफडती
आणि टाकती त्रुटित श्वास.
पृथ्वीवरती तिमिर दाटतो
मनाभोंवती पाश आवळतो
ताजमहाल पिशाचरूपें उभा ठाकतो.
आणि भेगांच्या जाळ्यांमधून शरीरावरच्या
‘ काळ्या ’ ताजाच्या
तरंग उठती घूं घूं करती.
श्वास टाकती
ललना सुमनें चुरमडलेली
तृप्तकराया शहाजहांची
शरीरसुखाची सदासदाची वखवखलेली
पेटलेली आग.
आणि मिसळतो त्या सुमनांच्या निश्वसितांत
शहाजहांचा लांब उसासा—
“ हा य मु म ता ज ! ”

---

## ३१. दोन दंवबिंदु:—

१

रंग मावळले

गंध विरले

तेजनिर्जीव तरंग निमाले

फूल सुकलें

धुळींत फेकलें

क्रूर लाथाडलें

विकटहास्याचा प्रेतमंत्रगान

सो ने री व नीं फुलपांखरांनी

*

-२-

....पण ...निष्प्राणाला त्याला सुमाला

तूं उचललें

आणून जवळ अगदीं जवळ

हृदयाजवळ

जीवन वायु त्यांत श्वासला.

नेत्रजीवन त्यावरि सिंचलें

आणि....तें फुललें

पुनः फुललें !

*

३

जीवन पथीं

सहज भेटली

जीवनिर्माती.

फूल सुकलें—

पुन. हासलें !

ऐसेच हासेल

हासेल सदाच

हृदयिं तुझ्याच

पण कडावरि

........

त रा र ती ल

ह स त मु खी

दों न दं व बिं दू !

---

## ३२. अर्धस्फुट कळ्याः—

अनंत व्योमाच्या निळ्या गादीवर
सुस्तावलेला
काळा मस्त मेघ
लोळत आहे
आणि हें शरीर आळसावलेलें
हिरण्यागार बिछायतीवर,
मनाला करते गुदगुदल्या
तरल तरल
गोड झुळूक.
शुक्राची कळी चंद्र केतकींत
निशिगंधाची रातराणीच्या
नाजूक वेलींत
उ म ले, फु ले.
धुंद सुगंध....
आणि झुलतात
अर्धस्फुट कळ्या,
जशा फुलल्या
आदिपुरुषाच्या शरीरावरती
आठवूनी खेळ
आ दि मा ये चा !

---

## ३३. बांधल्या मुसक्याः

बांधल्या मुसक्या चांदण्या रात्रीच्या
मुखांत बोळा कोंबला तिच्या
काळ्या मेघांचा.
आणि सपकन् बसतो पाठीं
वीजेचा आसूड.
ढाळते अश्रू असहाय्य रात....
नि मारिते डंख
गांधील माशी
जखमी मनाला
स्मृ ती ची किं चा ळी—
खडीखडीची ओझीं वाहून
पाठ पिचली
आणि सालडी तिची निघाली
मिठाच्या पाण्यानें भिजविलेल्या
वेताच्या प्रहारें.
असा बापुडा तहानलेला
भूत बनलेला
येतो मानव
वडानिकटच्या तलावाच्या कांठीं
तृषा आपुली
शांतवावया.

वडावरचे काळे कावळे
डावे तिरळे फिरवीत डोळे
टोंच मारिती
मांस काढिती
दीन मानवाच्या ओल्याताज्या ओल्या
जखमेंतून.
नि चोंच चोखिती मिटक्या मारिती
गूंजन करिती...
का व का व का व !
मानव विवळे कळवळून...
आर्त किंचाळी
भेदून गेली
अवकाशाला !
पण जवळच....
ह्म शी टो ण गे
हर्ष मदानें डोळे मिटुनी
कृष्ण गोपींचा
खेळ खेळती !

---

## ३४. घे रूप आतां:—

आह्मी केला यज्ञ केली तपश्चर्या
शतकें विरलीं
अनंतत्वांत
आहुति दिधली रक्ताची देहांची
भारावले डोळे वाट पाहुनी
दमल्या नेत्रांच्या शिणल्या बाहुल्या
स्थिर जाहल्या.
आणि एकदांची पातलीस तूं
आलीस तूं पण....
हाडें पदतलीं चूर्ण करीत
छिन्नविच्छिन्न शिराविनादेह
गळ्यांत घालुनी नररुंडमाला.
डमरू वाजे तांडव घुमे
अणूअणूंत घोर संग्राम
आलीस खरी तूं
पण....
महाकाली!!

\+ +

पुनः झाला यज्ञ आहुत्या अमोल
कुंडांत पडल्या पृथ्वी मोलाच्या.

घे आतां तरी
निराळें रूप
ये आतां तरी—
उधळित शुभ मंगलाक्षता
लावूनि भालीं चंद्राची कोर
तारकाफुलांची माथ्यावरी वेणी
ये आतां तरी—
विश्वगोलांच्या गीततालावरी
ठेका धरीत शांत हासत
ये फुलवीत
सुवासकमळें
उमटतील जेथें जेथें तुझ्या शुभपदमुद्रा.
ये फुलवीत
सुवासकमळें,
ज्यांतील पराग दिव्य मांगल्य
सुगंध जयांचा
अनुभवून
पायीं लोळेल फुलांचा राजा
वसंतऋतू.
ये आतां तरी घे रूप दुजें
सौ भा ग्य ल क्ष्मी चें.

———

## ३५. आर्द्राः—

मुखावरची डाळिंबी दीप्ति
उणेपणा देते उषासंध्यारंगा
अशी तेजस्विनी
कोमला प्रेमला
उज्ज्वला बाला
सुहासिनी आर्द्रा !

\+ +

जन्मापासून स्थलकालाच्या
विश्वावकाशाची व्योमसागराची
चिरप्रवासिनी
तेजस्विनी आर्द्रा
वल्हवे एकाकी आपली नौका
चकाकणारी शांतरत्नतेजें.
चालली चालली
स्थि र ध्रु वा क डे
हसतमुखी प्रवासिनी आर्द्रा !
प्रवासांत तिच्या
चालूं लागलेला उलटा सुलटा,
बुद्धीचा स्वामी

वक्र गतीनें येतां निकट
क्रोधाग्नि पेटतो तिच्या अंतरांत.
ती हसतमुखी
कोमला बाला
होते चटकन् व न्हि शि खा रू प.
प्रळयकाळाची नाचते बिजली
आणि सर्वत्र र क्ता चीं का रं जीं !

\+ \+

प्रयासांत तिच्या—
फडफडवीत
डौलानें आपुल्या नौकांचीं शीडें
सृजनतत्त्वाचे र हाडवैरी
लागती पाठीं
बुडविण्यासाठीं
हिमापरि शुभ्र सृ ज न त त्त्वा च्या शु भ पि ल्ला ला
आणि तो भाकतो अर्धबुडलेला
दीन करुणा रुद्धकंठानें—
" करि रक्षण !! "
देते ती आश्रय त्याला दीनाला
आपल्या नौकेंत.
आणि तीं कोमला हसतमुखी

होते चा मुं डा.

स्वाहा करिते शुंभाशुंभांना
सृजनतत्त्वाच्या हाडवैऱ्यांना.
मुक्त शुभपिता हांसतो पुन्हां
कुं द ध व ल!

\+ +

प्रवासांत तिच्या—
कधीं केव्हांतरी भास होतो तिला
प्रे म ला बा ले ला—
व्योमरंगापरि शांत रम्य शांत
चैतन्यस्वरूपी
श्यामप्रेममूर्ति
वाजवी वीणा....
आल्हादते ती आणि सजविते
अवकाशाला
इंद्रधनुष्याच्या रंगीबेरंगी मृदुछटांनीं
आणि वर्षते ती
जी व न धा रा
को म ला प्रे मं ला प्र वा सि नी आ र्द्रा ! !

---